महाराष्ट्र शासन

**राज्यातील खनिजांचे अवैध उत्खननास प्रतिबंध करण्यासाठी समित्यांची स्थापना**

उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग
शासन निर्णय क्र.एमएनजी-१००५/प्र.क्र.८६७/उद्योग-९
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक-२७ जुलै, २०१०.

**प्रस्तावना-**

राज्यातील खनिजांच्या अवैध उत्खननास प्रतिबंध करणारी यंत्रणा प्रभावी करण्यासाठी राज्य व जिल्हा स्तरावर समित्या गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

खनिजांचे अवैध उत्खननसंबंधीं बाबींचा आढावा घेणे, उपाय योजना आखणे व अवैध उत्खनन प्रकरणी कार्यवाही करण्यासाठी सर्व संबधित विभागांचे सहकार्य तत्परतेने मिळण्याच्या दृष्टीने तसेच समन्वय साधण्याच्या दृष्टीने खाली नमूद केल्याप्रमाणे समित्या गटीत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

**राज्यस्तरीय समिती**

**समितीची रचना-**

| | | |
|---|---|---|
| १. | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव (खनिकर्म) | सदस्य |
| ३. | सचिव ( पर्यावरण ) | सदस्य |
| ४. | पोलीस महासंचालक, मुंबई | सदस्य |
| ५. | परिवहन आयुक्त मुंबई | सदस्य |
| ६. | प्रधान मुख्य वन संरक्षक महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| ७. | इंडियन ब्युरो ऑफ माईन्स नागपूर /गोवा यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ८. | संचालक,भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय महाराष्ट्र | सदस्य सचिव / निमंत्रक |

**राज्य स्तरीय समितीची कार्ये -**

१) संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय महाराष्ट्र यांनी गठीत केलेल्या राज्यस्तरीय / प्रादेशिक आणि जिल्हास्तरावरील दक्षता पथकांनी तसेच उपसंचालक भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय व वन अधिका-यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रात अवैध खाणकाम रोखण्यासाठी केलेल्या कार्यवाहीचा आढावा घेणे.

२) इंडियन ब्युरो ऑफ माईन्स तसेच अन्य प्राधिकरणाव्दारे निदर्शनास आलेल्या अवैध खाणकाम प्रकरणाबाबतचा आढावा घेणे, संनियंत्रण करणे व उपाययोजना आखणे.

३) संबधित विभागाकडून आपेक्षित कार्यवाहीबाबत समन्वय व सुसूत्रता आणणे.

४) अवैध खाणकामाशी संबंधित राज्य / केंद्र शासनाने संदर्भित केलेल्या प्रकरणी कार्यवाहीचा आढावा घेणे.

५) केंद्र / राज्य शासनास सादर करावयाच्या शिफारशी आणि केलेल्या कार्यवाहीच्या माहितीस मान्यता देणे.

राज्यस्तरीय समितीची बैठक प्रत्येक चौमाहीत किमान एक वेळा घेण्यात येईल.

## जिल्हास्तरीय समिती

**समितीची रचना**

| | | |
|---|---|---|
| १. | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २. | जिल्हा पोलीस अधीक्षक किंवा त्यांचे प्रतिनीधी | सदस्य |
| ३. | संबंधित उपजिल्हाधिकारी | सदस्य |
| ४. | जिल्हा परिवहन अधिकारी | सदस्य |
| ५. | जिल्हा वन अधिकारी | सदस्य |
| ६. | जिल्हा खनिकर्म अधिकारी | सदस्य सचिव |

**समितीची कार्ये-**

१) आपल्या कार्यक्षेत्रातील निदर्शनास आलेल्या अवैध खाणकाम प्रकरणी समन्वयाने कार्यवाही करणे.

२) अवैध खाणकाम रोखण्यासाठी आवश्यक उपाययोजना करणे.

३) अवैध उत्खनन व वाहतूक याला आळा घालण्यासाठी अचानक तपासणी करणे.

४) अवैध खाणकाम प्रकरणी केलेल्या कार्यवाहीची माहीती राज्यस्तरीय समितीस सादर करणे.

५) कार्यवाही करण्यात अडचणी आल्यास त्या राज्यस्तरीय समितीच्या निदर्शनास आणणे.

~~राज्य~~ जिल्हा स्तरीय समितीची बैठक दोन महिन्यातून किमान एकदा घेण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( य.शं.कुलकर्णी )
शासनाचे अवर सचिव

प्रत-

अपर मुख्य सचिव ( वने ) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
अपर मुख्य सचिव ( महसूल) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
अपर मुख्य सचिव ( गृह ) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
प्रधान सचिव (उद्योग व खनिकर्म) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग मंत्रालय, मुंबई-३२
प्रधान सचिव ( पर्यावरण ) पर्यावरण विभाग
पोलीस महासंचालक, मुंबई
परिवहन आयुक्त मुंबई
प्रधान मुख्य वन संरक्षक नागपूर
इंडियन ब्युरो ऑफ माईन्स नागपूर
संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर
उपसंचालक, संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर / चंद्रपूर / कोल्हापूर व औरंगाबाद
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक
सर्व जिल्हा खनिकर्म अधिकारी
सर्व जिल्हा परिवहन अधिकारी.

----------